महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, मौजे उत्तन, जि. ठाणे यांचेकडील सौरऊर्जा प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्याअप्र-१५२४/ प्र.क्र.१३३/का.९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०४ जून, २०२५.

संदर्भ : सह संचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि.ठाणे यांचे क्र.१) मन्याअ/उत्तन/१४१७/ २०२४ दि. २४.०९.२०२४. २) मन्याअ/उत्तन/५७०/२०२५ दि.१७.०३.२०२५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, मौजे उत्तन, जि. ठाणे यांचेकडील संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये अकादमी परिसरात सौरउर्जा प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. त्यानंतर संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण(महाऊर्जा) यांनी अकादमी मध्ये सौरऊर्जा संच आस्थापित करणेसाठी रु.१,७७,१७,९६३/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिल्याचे नमुद करुन, त्यापैकी तांत्रिक मान्यता शुल्क रु.१,९५,२४८/- अकादमीतर्फे भरण्यात आले आहे व या प्रकल्पासाठी लागणारी उर्वरित रक्कम रु.१,७५,२२,७१५/- करीता प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती करण्यात आली आहे. महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, मौजे उत्तन, भाईंदर, जि.ठाणे यांच्या सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, मौजे उत्तन, भाईंदर, जि. ठाणे येथील अकादमीमध्ये ३०० कि.वॅ. क्षमतेचा पारेषण संलग्न (Ground

mountained) सौरऊर्जा संच आस्थापित करण्यात येणार आहे. सदर सौर ऊर्जा संचासाठी महाऊर्जाकडून प्राप्त दरपत्रकानुसार एकूण रु.४,२२,८८,०००/- इतका खर्च अपेक्षित आहे. विभागीय महाव्यवस्थापक, महाऊर्जा, महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण, मुंबई यांनी सादर केलेल्या रु. ९९,८९,५००/- इतक्या किंमतीच्या प्रस्तावास जिल्हा नियोजन समिती, ठाणे यांनी प्रशासकीय मान्यता दिली. त्यानंतर ऊर्जा विभागाच्या अभिप्रायांच्या अनुषंगाने सौर ऊर्जा संच कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक असलेल्या उर्वरित रु. ३,२२,९८,५००/- इतक्या रक्कमेचा प्रस्ताव महाऊर्जाकडे तांत्रिक मान्यतेसाठी सादर केला असता, त्यांनी रु.१,७७,१७,९६३/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार तांत्रिक मान्यता दिली आहे.

| अ.क्र. | योजनेचे नांव | सौर साधनांचा तपशील | सौर उर्जा प्रकल्पांची क्षमता | अंदाजित किंमत (रक्कम रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र न्यायिक अकादमी उत्तन, भाईंदर, जि. ठाणे येथे सौर ऊर्जा संच आस्थापित करणे | पारेषण संलग्न Ground Mounted | ३०० कि. वॅ. | १,६५,४६,४७३/- |
| एकूण (अ) | | | | १,६५,४६,४७३/- |
| अपाऊ-२०२०//प्र.क्र.१३७//उर्जा-७ दि.३१/१२/२०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार तांत्रिक मंजूरी शुल्क १% +१८% वस्तु व सेवा करासह (ब) | | | | १,९५,२४८/- |
| अपाऊ-२०२०//प्र.क्र.१३७//उर्जा-७ दि.३१/१२/२०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रकल्प व्यवस्थापन शुल्क ५% +१८% वस्तु व सेवा करासह (ब) | | | | ९,७६,२४२/- |
| एकूण (अ+ब+क) (अक्षरी रुपये एक कोटी सत्याहत्तर लाख सतरा हजार नऊशे त्रेसष्ट फक्त) | | | | १,७७,१७,९६३/- |

उपरोक्त तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या रु. १,७७,१७,९६३/- रक्कमेपैकी रु. १,९५,२४८/- इतके मान्यता शुल्क अकादमीतर्फे भरण्यात आले आहे. उर्वरित रु. १,७५,२२,७१५/- **(अक्षरी रुपये एक कोटी पंचाहत्तर लाख बावीस हजार सातशे पंधरा फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दि.०७.०४.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद १३ मधील सूचनांचे पालन करावे. तसेच महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) यांच्या दि. १३.०३.२०२५ च्या पत्रात

नमुद केलेल्या अटींचे पालन करावे व प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४ - न्यायदान, (०५) न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, (०५) (०१) न्यायिक अधिकारी, प्रशिक्षण संस्था (२०१४ ०७१७) (अनिवार्य) अंतर्गत २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षात निधी विहीत पध्दतीने अर्थसंकल्पित करून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०४१११७३६७९१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढ़ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAGAR JAGDISH BONDRE

Digitally signed by SAGAR JAGDISH BONDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Law and Judiciary Department, 2.5.4.20=758E680C096816E7BC8C5CFA4D68A0A2C4BF018A47792BA2218CFC8931BAFB94, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FBFC75851717C6A4821D7E342915AFB63273FFBA8DB7B62A81FFC78124ACD737, cn=SAGAR JAGDISH BONDRE
Date: 2025.06.04 11:18:42 +05'30'

**( सागर ज. बोंद्रे )**
**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
३) प्रबंधक (निरीक्षणे-१/२), मा. उच्च न्यायालय, मुंबई.
४) सहसंचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, उत्तन, भाईंदर, जि.ठाणे.
५) विभागीय महाव्यवस्थापक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), १०१२/ए, १० वा मजला, एम्बॅसी सेंटर, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१.
६) महालेखापाल -१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे.
१०) वित्त विभाग (व्यय-५)
११) कक्ष अधिकारी (का.-२३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती- का.-९